"उद्योग उप संचालक (तांत्रिक) गट-अ" या पदावर नामनिर्देशनाने नियुक्ती देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक- नियुक्ती-१०१५/प्र.क्र.५५/उद्योग-३**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक - १७ नोव्हेंबर, २०१५.

पहा :- सचिव,महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई यांचे पत्र क्रमांक- ६८८(१)/१३१५४/आठ, दिनांक २३ एप्रिल, २०१५ व दिनांक ३ ऑगस्ट, २०१५

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केल्याप्रमाणे पुढील १३ उमेदवारांची **उद्योग उप संचालक (तांत्रिक) गट-अ** या संवर्गातील पदांवर रुपये १५६००-३९१०० + ग्रेड पे रु.५४०० अधिक नियमानुसार प्राप्त होणारे महागाई भत्ता व इतर भत्ते, या वेतनश्रेणीत नियुक्ती करण्यात येत आहे. ते ज्या दिनांकापासून पदभार स्वीकारतील त्या दिनांकापासून पहिली दोन वर्षे परिविक्षा कालावधीवर राहतील. त्यांच्या सेवा ज्येष्ठतेबाबत योग्य वेळी स्वतंत्र आदेश निर्गमित करण्यात येतील.

२. शासनाच्या मागणीपत्रानुसार, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संदर्भाधीन पत्रान्वये खाली दिलेल्या विवरणपत्रामध्ये दर्शविल्याप्रमाणे उमेदवारांची गुणवत्तेनुसार व वर्गवारीनुसार नियुक्तीसाठी शिफारस केली आहे.

| अ. क्र. | उमेदवाराचे नाव | गुणवत्ता क्रमांक | वर्गवारी | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | श्री. पाटील चेतन भाऊराव | १ | इमाव | अराखीव पदासाठी |
| २ | श्री.मुद्दमवार शिवकुमार सायण्णा | २ | अज | अराखीव पदासाठी |
| ३ | श्री.रोकडे संदीप बबन | ३ | अजा | अराखीव पदासाठी |
| ४ | श्री.राठोड स्वप्नील रमेशराव | ४ | अज | अ.ज. साठी राखीव पदासाठी |
| ५ | श्री. पाटील संदीप प्रकाश | ५ | इमाव | इ.मा.व. राखीव पदासाठी |
| ६ | श्री.पाटील अजयकुमार तानाजीराव | ६ | खुला | अराखीव पदासाठी |
| ७ | श्री.निकम निलेश सुभाषराव | ७ | इमाव | इ.मा.व.(अनु.) राखीव पदासाठी |
| ८ | श्री. सांगळे उपेन्द्र किसन | ८ | अ.जा. | अ.जा. राखीव पदासाठी |
| ९ | श्री. राठोड विवेक दिगंबर | ९ | विजा(अ) | विजा(अ) राखीव पदासाठी |
| १० | श्रीम.पाटील मोनाली गोपीनाथ | १० | इमाव | इ.मा.व.(म) राखीव पदासाठी |
| ११ | श्रीमती खरात करुणा विश्वनाथ | ११ | अजा | अ.जा.(म) राखीव पदासाठी |
| १२ | श्रीमती शर्मा अर्चना नंदकिशोर | १२ | खुला | अराखीव (म) पदासाठी |
| १३ | श्रीमती जगताप किर्ती चंद्रशेखर | १३ | खुला | अराखीव (म) पदासाठी |

३. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने केलेल्या शिफारशीच्या अनुषंगाने नियुक्ती देण्यासाठी, उपरोक्त उमेदवारांची वैद्यकीय तपासणी, पूर्व चारित्र्य व चारित्र्य तपासणी, जात प्रमाणपत्र व जात पडताळणी प्रमाणपत्र तपासणी तसेच नॉन क्रिमिलेयर प्रमाणपत्र पडताळणी, संगणक हाताळणी प्रमाणपत्र तसेच इतर आवश्यक कागदपत्रांची पूर्तता झालेली आहे. सदर उमेदवारांची **"उद्योग उप संचालक (तांत्रिक) गट-अ"** या संवर्गातील पदांवर खालीलप्रमाणे **पदस्थापना** करण्यात येत आहे.:

| अ. क्र. | उमेदवाराचे नाव | पदस्थापनेचे पद व ठिकाण |
|---|---|---|
| १ | श्री. पाटील चेतन भाऊराव | महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र, चंद्रपूर |
| २ | श्री.मुद्दमवार शिवकुमार सायण्णा | महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र, यवतमाळ |
| ३ | श्री.रोकडे संदीप बबन | महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र, लातूर |
| ४ | श्री.राठोड स्वप्नील रमेशराव | महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र, धुळे |
| ५ | श्री. पाटील संदीप प्रकाश | महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र, वर्धा |
| ६ | श्री.पाटील अजयकुमार तानाजीराव | महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र, अकोला |
| ७ | श्री.निकम निलेश सुभाषराव | महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र, जालना |
| ८ | श्री. सांगळे उपेन्द्र किसन | महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र, नंदूरबार |
| ९ | श्री. राठोड विवेक दिगंबर | महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र, गडचिरोली |
| १० | श्रीमती पाटील मोनाली गोपीनाथ | महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र, बुलढाणा |
| ११ | श्रीमती खरात करुणा विश्वनाथ | उद्योग उपसंचालक (तांत्रिक), मुख्यालय, मुंबई |
| १२ | श्रीमती शर्मा अर्चना नंदकिशोर | उद्योग उपसंचालक (तांत्रिक), विभागीय कार्यालय, पुणे |
| १३ | श्रीमती जगताप किर्ती चंद्रशेखर | उद्योग उपसंचालक (तांत्रिक), मुख्यालय, मुंबई |

४. उपरोक्त उमेदवारांनी, सदर आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या आत नियुक्तीच्या पदाचा पदभार स्वीकारावा अन्यथा त्यांची नियुक्ती रद्द करण्यात येईल.

५. पदभार स्वीकारल्याचा अहवाल संबंधित उमेदवारांनी विकास आयुक्त (उद्योग) मुंबई यांना सादर करावा. विहित कालावधीत ते रुजू झाले नाहीत तर विकास आयुक्त (उद्योग) यांनी तसा अहवाल पुढील कार्यवाहीसाठी शासनाकडे पाठवावा.

६. उमेदवारांनी त्यांच्या नियुक्तीच्या दिनांकापासून दोन वर्षांच्या परिविक्षा कालावधीमध्ये दोन संधींमध्ये विभागीय परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. परिविक्षा कालावधीत विहित संधींमध्ये विभागीय परीक्षा उत्तीर्ण न झाल्यास तसेच त्यांनी कामाचा अपेक्षित दर्जा प्राप्त न केल्यास आणि अशा त-हेने त्यांचे काम किंवा वर्तणूक अयोग्य अथवा अननुरुप आढळल्यास ते सेवेतून कमी करण्यास पात्र ठरतील. तसेच जर ते अगोदरच परीक्षा उत्तीर्ण झालेले नसतील किंवा त्यांना परीक्षेत सूट मिळाली नसेल तर विहित

नियमानुसार मराठी व हिंदी भाषा परीक्षा तसेच संगणक हाताळणीबाबतची परीक्षा त्यांना उत्तीर्ण व्हावे लागेल.

७. परिविक्षा कालावधीमध्ये एक वर्षानंतर त्यांना पहिली वेतन वाढ देय राहील. तथापि, नंतरच्या वेतनवाढी मात्र परिविक्षा कालावधी यशस्वीपणे पूर्ण झाल्यानंतर देय राहतील.

८. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अंनियो १००५/१२६/सेवा-४, दि.३१.१०.२००५ अन्वये उमेदवाराना नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू होईल. सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना त्यांना लागू होणार नाही. मात्र उपरोक्त उमेदवारांपैकी जे उमेदवार १ नोव्हेंबर, २००५ पूर्वी शासन सेवेत निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेवर कार्यरत असतील त्यांना शासन परिपत्रक वित्त विभाग, क्र.अंनियो १००६/८७/सेवा-४, दि. १२ जानेवारी २००७ मध्ये नमूद केलेल्या अटींच्या पूर्ततेच्या अधीन राहून महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्ती वेतन) नियम १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू राहील.

९. सदर उमेदवारांना राजीनामा द्यावयाचा असेल तर त्यांनी शासनाला कमीत कमी एक महिन्याची पूर्वसूचना दिली पाहिजे, तसेच त्यांना सेवेतून कमी करावयाचे झाल्यास शासन त्यांना एक महिन्याची पूर्वसूचना देईल. तथापि त्यांनी सेवेच्या कालावधीत दुर्वर्तन वा सेवेच्या शर्तीचा भंग केल्यास या पूर्वसूचनेचा कालावधी विचारात न घेता त्यांना सेवेतून कमी करण्यात येईल.

१०. वरील उमेदवारांचे गोपनीय अहवाल ते शासकीय सेवेत रुजू झाल्यापासून ठेवण्यात येतील. तसेच नेहमीप्रमाणे दरवर्षी योग्य त्या प्राधिकाऱ्याकडे सादर करण्यात येतील.

११. वरील उमेदवारांचा परिविक्षा कालावधी संपल्यानंतर, त्या समाप्तीला शासनाची मंजुरी घेण्याकरिता विकास आयुक्त (उद्योग) यांनी शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक-एसआरव्ही-१०६२/डी, दिनांक २६.४.१९६२ मध्ये विहित केलेल्या नमुन्यात त्यांच्या बाबतचा विशेष अहवाल (दोन प्रतींमध्ये) शासनाकडे पाठवावा.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५१११७१७४७५०३३१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vaijnath Bhujangrao Latake

Digitally signed by Vaijnath Bhujangrao Latake
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8502d8fbaa5d3d31358e5bf349fc0853019893b61049b2ad260bccf75c596136, cn=Vaijnath Bhujangrao Latake
Date: 2015.11.17 17:49:56 +05'30'

**(वै.भू. लटके)**

शासनाचे उप सचिव

**प्रति,**

१. विकास आयुक्त(उद्योग) उद्योग संचालनालय, मुंबई.

२. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा) मुंबई.
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई.
४. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परिक्षा) नागपूर.
५. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता) नागपूर.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी व लेखा अधिकारी, मुंबई.
८. विशेष कार्य अधिकारी, मा.विरोधी पक्षनेता, विधान सभा/विधान परिषद यांचे कार्यालय, विधान भवन, मुंबई,
९. उद्योग सहसंचालक, सर्व विभागीय कार्यालये, (उद्योग संचालनालयामार्फत),
१०.संबंधित जिल्हा उद्योग केंद्र (उद्योग संचालनालयामार्फत),
११.संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी (उद्योग संचालनालयामार्फत),
१२.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
१३.कार्यासन उद्योग-३ (निवड नस्ती)

**प्रत : संबंधित उमेदवार**

१. श्री.पाटील चेतन भाऊराव, मु.सिंदखेडा,पो.व ता.रावेर, जिल्हा जळगाव-४२५५०८
२. श्री.मुद्दमवार शिवकुमार सायण्णा, फ्लॅट नं. १०३, राधाकृष्ण अपार्टमेंट, ख्रिस्ती कॉलनी, कॅम्प, अमरावती, जिल्हा-अमरावती
३. श्री.रोकडे संदीप बबन, ११४४, जैन मंदीरसमोर, वैभव कॉलनी, जोगेश्वरी हॉस्पिटल जवळ, विजयनगर, काळेवाडी, पिंपरी, ता. हवेली, जिल्हा पुणे- ४११०१७
४. श्री.राठोड स्वप्नील रमेशराव,प्लॉट नं.१८४, न्यू सुभेदार ले आऊट, एनआयटी ग्राउंडसमोर, हुडकेश्वर रोड, नागपूर, जिल्हा नागपूर-४४००२४
५. श्री. पाटील संदीप प्रकाश, सुधीर प्रकाश देवरे, २२९/२ए प्लॉट नं.जी १, आशिर्वाद ड्रीम सिटी, पुगांव रोड, ता.पाचोरा, जिल्हा जळगाव-४२४२०१
६. श्री.पाटील अजयकुमार तानाजीराव, बी/४०३, ओम साईसृष्टी को.ऑ.हौ. सोसायटी, खारेगाव नाका, कळवा, जिल्हा-ठाणे.
७. श्री.निकम निलेश सुभाषराव, शिवनेरी बिल्डींग, अतुल मंगल कार्यालयासमोर, रुक्मीणीनगर, अमरावती, जिल्हा अमरावती-४४४६०६
८. श्री. सांगळे उपेन्द्र किसन, द्वारा सांगळे रविंद्र किसन, १२, निर्मिती अपार्टमेंट्स, त्रिमुर्ती भेळ शेजारी, कुंभार गल्ली, मु.पो.ता. श्रीगोंदा, जिल्हा अहमदनगर-४१३७०१
९. श्री. राठोड विवेक दिगंबर, प्लॉट नं. १४, सर्व्हे नं.१७०, मोहिनीराजपुरम, भगतसिंगनगर रोड, हरसुल, औरंगाबाद-४३१००८
१०.श्रीमती पाटील मोनाली गोपीनाथ, द्वारा श्री.जी.के. पाटील, जैन पत्रा डेपो, सटाणा नाका,सोयगांव, ता.मालेगाव, जिल्हा नाशिक-४२३२०३
११.श्रीमती खरात करुणा विश्वनाथ, प्लॉट क्र.४९, लोकमान्य नगर, गुरूकृपा रेसिडेन्सीच्या बाजूला, बार्शी रोड, लातूर.

१२.श्रीमती शर्मा अर्चना नंदकिशोर, बी-०५, तिरुपती अपार्टमेंट, साईधाम, सरावली, बोईसर, जिल्हा पालघर. पीन-४०१५०१.

१३.श्रीमती जगताप किर्ती चंद्रशेखर, प्लॉट नं.११, श्रीकृष्ण हौसिंग सोसायटी, शिवाजी इंग्लिश मिडीयम स्कूल जवळ, त्रिशूल हौसिंग सोसायटीच्या मागे, सासवड, ता.पुरंदर, जिल्हा पुणे -४१२३०१